**जय महाराष्ट्र व दिलखुलास या कार्यक्रमांच्या वाढीव नवीन दरानुसार निर्मिती व प्रसारण खर्चास प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय, क्रमांक:मावज-२०१८ /प्र.क्र.३६४/३४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक: - १९ डिसेंबर,२०१८

वाचा : १. सामान्य प्रशासन विभाग, शासन ज्ञापन क्र. माजम-२०१२/प्र.क्र.२७६/३४, दि. ३ सप्टेंबर,२०१२

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन ज्ञापन क्र. माजम-२०१३/प्र.क्र.१३२/३४, दि. २३ एप्रिल,२०१३

३. माहिती जनसंपर्क महासंचालनालयाचे पत्र क्र. वृत्तचित्र-२०१८/दिल.जय महाराष्ट्र/का-७/५८८ दि. ११ ऑक्टोबर, २०१८

**प्रस्तावना:-**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत शासकीय योजनांच्या प्रसिध्दीचा जय महाराष्ट्र हा कार्यक्रम दूरदर्शनवर व दिलखुलास हा कार्यक्रम आकाशवाणीवरुन प्रसारीत करण्यात येत आहेत. केंद्र शासनाच्या प्रसार भारतीने दि.१५ फेब्रुवारी, २०१७ च्या पत्रान्वये दरामध्ये सुधारणा केल्यामुळे कार्यक्रमांच्या निर्मिती व प्रसारण खर्चात वाढ झाल्यामुळे सदर कार्यक्रमांच्या निर्मिती व प्रसारण खर्चास सुधारीत मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने पुढील निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय:-**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत शासकीय योजनांच्या प्रसिध्दीचा जय महाराष्ट्र हा कार्यक्रम दूरदर्शनवर व दिलखुलास हा कार्यक्रम आकाशवाणीवरुन सुरु आहे. केंद्र शासनाच्या प्रसार भारतीने दि.१५ फेब्रुवारी, २०१७ च्या पत्रान्वये दरामध्ये सुधारणा केल्यामुळे कार्यक्रमांच्या निर्मिती व प्रसारण प्रति भागासाठी येणाऱ्या खर्चास खालीलप्रमाणे शासन मंजूरी देण्यात येत आहे

२. दिलखुलास व जय महाराष्ट्र कार्यक्रमाच्या प्रसारण खर्चाच्या दराचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

**अ) जय महाराष्ट्र**

| | सुधारित दर |
|---|---|
| प्रति भागासाठी प्रसारण खर्च | २०,०००/- |
| २५% सवलत (-) | ५,०००/- |
| एकूण | १५,०००/- |
| रु.१५,०००/- + १८% GST | २,७००/- |
| **एका भागाचा एकूण खर्च** | **१७,७००/-** |
| **सीडी रुपांतरण** | १५००/- |

**ब) दिलखुलास**

| | **सुधारित दर** |
|---|---|
| प्रति भागासाठी प्रसारण खर्च | ३४,६२०/- |
| १५% सवलत (-) | ५,१९३/- |
| एकुण | २९,४२७/- |
| १८% GST | ५,२९७/- |
| **एका भागाचा एकूण खर्च** | **३४,७२४/-** |

३. प्रस्तुतचा खर्च सामान्य प्रशासन विभाग, मागणी क्र. ए-६, २२२०- माहिती व प्रसिध्दी, ०१ चित्रपट, १०५ चित्रपटांची निर्मिती (००) (०१) चित्रपटांची निर्मिती, संगणक सांकेतांक (२२२० ०३८४), ५० इतर खर्च (अनिवार्य) या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३९६/२०१८/व्यय-४ दि.२१/११/२०१८ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१८१२१९१२१२१६७८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramkisan Narayanrao Musale

Digitally signed by Ramkisan Narayanrao Musale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e28f6332f6edfebdfb055bf154f99ec0b0d9e613209e20e7a215f026da6875ae, cn=Ramkisan Narayanrao Musale
Date: 2018.12.19 12:21:07 +05'30'

**(रा.ना.मुसळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. राज्यपालांचे सचिव
२. मुख्यमंत्र्यांचे सचिव
३. मुख्यमंत्र्यांचे विशेष कार्य अधिकारी(माध्यम सल्लागार)
४. सर्व मंत्री/राज्यमंत्री/यांचे खाजगी सचिव
५. मुख्य सचिव/अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
६. महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय,मुंबई
७. महालेखापाल, (लेखापरीक्षण) (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई, नागपूर
८. अधिदान व लेखाधिकारी ,मुंबई
९. निवासी लेखापरीक्षा अधिकारी,मुंबई

१०.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
११.लेखाधिकारी(आहरण व संवितरण),माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय,मुंबई,(२प्रती)
१२. संचालक(माहिती) (प्रशासन) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१३.मुख्यमंत्र्यांचे जनसंपर्क अधिकारी, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई
१४.मा.राज्यमंत्री(मा.व ज.), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१५.उप संचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१६.सर्व मंत्रालयीन विभाग
१७.सर्व विभागीय आयुक्त
१८. सर्व जिल्हाधिकारी
१९.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२०.सर्व मंडळे/महामंडळे/स्थानिक स्वराज्य संस्था/शासनाच्या स्वायत्त संस्था
२१.सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
२२.संचालक(माहिती), नागपूर-अमरावती
२३.संचालक(माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली
२४.उप संचालक(माहिती), नाशिक, पुणे, औरंगाबार, अमरावती, कोकण, कोल्हापूर विभाग
२५.सर्व जिल्हा माहिती अधिकारी
२६.सर्व उप माहिती कार्यालये
२७.निवडनस्ती.